शासकीय अधिकारी/कर्मचारी व विविध क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती यांना करारपध्दतीने नियुक्ती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-सीबीई-1893/प्र.क्र.38/93/तेरा,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 15 फेब्रुवारी, 1995.

**वाचा:-** 1. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरईएम-1089/प्र.क्र.2/89/13, दिनांक 9.2.1989.

2. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरईएम-1593/प्र.क्र.75/ /13, दिनांक 22.12.1993.

3. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरईएम-1594/467/13, दिनांक 3.9.1994.

**शासन निर्णय:-** शासकीय अधिकारी व कर्मचारी यांना अतिशय अपवादात्मक परिस्थितीत व सार्वजनिक हिताच्या दृष्टीने पुनर्नियुक्ती देण्याबाबत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरईएम-1089/प्र.क्र.2/89/तेरा, दिनांक 9.2.1989 अन्वये जे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत, त्या संदर्भात सुधारित आदेश शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरईएम-1594/467/13, दिनांक 3.9.1994 अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. परंतु मंत्रालयीन विभागांकडून शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना करारपध्दतीनेही नियुक्ती देण्याबाबतचे प्रस्ताव या विभागात प्राप्त होतात. याबाबतच्या सर्वसाधारण अटी व शर्ती निश्चित करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासनाने आता याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेले आहेत:-

1) करारपध्दतीने नियुक्ती ही नियमित कामकाजासाठी न करता विवक्षित कामासाठी (उदा. पूर्वी ज्या प्रकारची कामे शासकीय यंत्रणेद्वारे करण्यात आलेली आहेत आणि त्यासाठी अनुभवी कर्मचारी उपलब्ध नसतील अशी कामे करणे, शासकीय नियम पुस्तिकांचे अद्यावतीकरण करणे, प्रकल्प/योजनेचा आराखडा तयार करणे इत्यादी) करण्यात यावी, अशा व्यक्तीस त्या कामासाठी लागणारी विशेष अर्हता अथवा संबंधित कामाचा विशेष अनुभव असणे ही पूर्व अट ठेवण्यात यावी.

2) ज्या विशेष कामासाठी करार पध्दतीने नेमणूक केली जाईल त्या कामाचे स्वरुप व व्याप्ती लक्षात घेऊन नेमणूकीचा कालावधी निश्चित करण्यात यावा आणि असा कालावधी कोणत्याही परिस्थितीत एक वर्षापेक्षा जास्त असू नये.

3) सेवानिवृत्त शासकीय अधिकारी/कर्मचारी याची करार पध्दतीने नियुक्ती केल्यास त्यांना सेवानिवृत्तीपूर्वी मिळत असलेले वेतन वजा निवृत्तीवेतन अशी जी एकूण रक्कम येईल ती रक्कम पारिश्रमिक म्हणून देण्यात यावी. मात्र पारिश्रमिकाची रक्कम कंत्राट पध्दतीने नियुक्ती करण्यात येणा-या पदाच्या वेतनश्रेणीतील कमाल टप्प्यापेक्षा जास्त असू नये.

4) प्रकल्प/योजनेचा आराखडा तयार करताना किंवा अन्य विशेष कामासाठी त्या क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींची करार पध्दतीने नेमणूक केल्यास त्या कामाचे स्वरुप व कालावधी लक्षात घेऊन अशा व्यक्तीस द्यावयाचे पारिश्रमिक स्वतंत्रपणे गुणवत्तेनुसार ठरावे. मात्र हे पारिश्रमिक रुपये 10,000/- पर्यंत मर्यादित ठेवावे.

(कृ.मा.प.)

रोटा/एच-1352(3,500-2-95)

5) नेमणूकीच्या विहित कालावधीत काम पूर्ण करण्याची जबाबदारी त्या व्यक्तींची राहील व तसे बंधपत्र यांच्याकडून घेण्यात यावे. काम पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र संबंधित विभाग प्रमुखांनी दिल्यानंतरच पारिश्रमिकाच्या शेवटच्या दोन मासिक हप्त्यांची रक्कम त्यांना देण्यात यावी. विहित मुदतीत सोपविलेले काम सदर व्यक्तींच्या आटोक्याबाहेरील कारणामुळे पूर्ण झाले नाही तरच मुदतवाढ देण्याबाबत विचार करण्यात यावा.

6) सदर अधिका-यांस/कर्मचा-यास त्याच्यावर सोपविलेल्या कामाचे स्वरुप/अनुज्ञेयता लक्षात घेऊन दूरध्वनी व वाहन सवलत देण्याबाबत विचार करण्यात यावा.

7) शासकीय निवासस्थानात रहाणा-या व्यक्तीची करार पध्दतीने नेमणूक केल्यास व करार कालावधीत तो अधिकारी शासकीय निवासस्थानात रहात असल्यास त्याच्याकडून नियमानुसार अनुज्ञप्ती शुल्क वसूल करण्यात येईल.

8) शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त अपवादात्मक परिस्थितीत करार पध्दतीने ठराविक कालावधीसाठी नेमणूक दिलेल्या व्यक्तीस शासकीय सेवेतील कोणत्याही पदावर सरळ सेवेने नियुक्तीसाठी विहित करण्यात आलेली शैक्षणिक अर्हता शिथिल केली जाणार नाही. मात्र, त्याबाबत वयोमर्यादेची अट रहाणार नाही.

2. करार पध्दतीवर नेमणूकीच्या प्रस्तावास सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाची पूर्व मान्यता घेण्यात यावी व त्या नंतर मुख्य सचिवांमार्फत शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

3. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक 104/95/सेवा-9, दिनांक 19 जानेवारी, 1995 नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

शांता शास्त्री
शासनाच्या प्रधान सचिव (सेवा).

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव,
* प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान सभा सचिवालय, विधान भवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, विधान भवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त, उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती.

* पत्राने.

------

एच-1352(3,500-2-95)